**ऑप्टीकल फायबर केबल जाळे**
**टाकणा-या अभिकरणांना**
**मार्गाचा हक्क देण्याबाबतचे**
**शासनाचे धोरण**

**<u>महाराष्ट्र शासन</u>**

सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्र. सी ओ एम २००१/सीआर १०५/०१/३९
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दि. २२ नोव्हेंबर, २००१

**पहा** - १) महसूल व वन विभाग क्र. जमीन १०/२०००/सीआर ९१/जे-आय, दि. २७.४.२०००
२) महसूल व वन विभाग क्र. जमीन १०/२०००/सीआर ९१/जे-आय, दि. १६.६.२०००

**<u>भुमिका</u>**

सुधारित तंत्रज्ञानातून अधिकाधिक सुसाध्य केलेल्या पारदर्शी प्रशासनाद्वारे माणसाची उन्नती साध्य करणे हे राज्य शासनाचे घोषित उद्दिष्ट आहे. उच्च गती ध्वनि / व्हिडिओ / आधारसामग्री हस्तांतरण, इलेक्ट्रॉनी वाणिज्य, दूरशिक्षण, इंटरनेट प्रवेश आणि इतर उपयोजने वापरणे शक्य व्हावे म्हणून ऑप्टिकल फायबर केबल जाळयावर आधिरित दळणवळणाच्या पायाभूत सुविधा महाराष्ट्रात उभारण्यासाठी अनेक खाजगी / सार्वजनिक क्षेत्रातील संस्थांनी प्रस्ताव सादर केले आहेत. या संस्थांना असे केबल जाळे टाकण्यासाठी विविध शासकीय विभाग आणि नागरी/ ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्था यांच्याकडून परवानगी घेणे आवश्यक असते. रस्त्यांच्या बाजुने / सार्वजनिक बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, नगरपालिका प्राधिकरणे, इतर नगरविकास प्राधिकरणे आणि महसूल व वन विभाग यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली असलेल्या राज्याच्या मालकीच्या जमिनीखालून ऑप्टिकल फायबर केबल जाळे टाकण्यास इच्छुक असलेल्या अभिकरणांना परवानगी देण्यासाठी शासनाने आपल्या वर उल्लेखिलेल्या निर्णयांन्वये धोरण ठरवून दिले आहे. अशी परवानगी देण्याची कार्यवाही अधिक सोपी करण्यात यावी यासाठीही विनंत्या करण्यात येत होत्या.

## शासन निर्णय

कार्यवाही अधिक सुलभ करण्याच्या दृष्टीने वर उल्लेखिलेल्या दोन शासन निर्णयांचे अधिक्रमण करुन शासन, पुढीलप्रमाणे आदेश देत आहे.

१. माहिती तंत्रज्ञान संचालनालय हे केबल टाकण्याच्या मार्गाचा हक्क देणारे केंद्रीभूत अभिकरण असेल आणि व्यक्ती / संस्था / लायसनधारक यांना, शासनाकडे जाण्यासाठी एकमेव संपर्क केंद्र म्हणून काम करील.

२. सार्वजनिक बांधकाम विभाग, जिल्हा परिषदा, नगरपालिका प्राधिकरणे, महसूल व वन विभाग आणि इतर शासकीय व अर्धशासकीय मंडळे, अशा अर्जदार व्यक्ती / संस्थांनी मार्गाचा हक्क प्राप्त करण्यासाठी शासनाबरोबर करार केल्यानंतरच, त्यांना केबल / वाहिन्या टाकण्याची परवानगी देतील.

३. दूरसंचार / इंटरनेट सेवा पुरवण्यासाठी भारत सरकारच्या दूरसंचार विभागाकडील विहित लायसन प्राप्त केलेली कोणतीही व्यक्ती वा संस्था, राज्याचे महामार्ग आणि रस्ते यांच्या बाजूने आणि / किंवा राज्याच्या जमिनीमध्ये, मागाहून केबल घालण्याच्या दृष्टीने ऑप्टिकल फायबर केबल / तांब्याची केबल / वाहिन्या यांचे जाळे घालण्यासाठी लायसन किंवा मार्गाचा हक्क देण्यासाठी, वेळोवेळी आवश्यक असेल त्यानुसार संचालक, माहिती तंत्रज्ञान, महाराष्ट्र शासन यांच्याकडे अर्ज करु शकेल.

४. अभिकरणाला / लायसनधारकाला माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडे पुढील कागदपत्रांसह अर्ज करता येईल.

अ. दूरसंचार विभाग, भारत सरकार यांच्याकडून मिळालेल्या लायसनची प्रत.
ब. ऑप्टिकल फायबर केबलच्या प्रस्तावित जाळयाचे प्राथमिक मार्ग-चित्र व जमिनींचा सर्वक्षण क्रमांक निहाय सूची .
क. या शासन निर्णयात विनिर्दिष्ट केल्या असतील अशा अटींचे व शर्तीचे स्वीकृती पत्र.
ड. प्रस्तावित गुंतवणूक, वित्त पुरवठयाचा प्रकार आणि प्रकल्पाचे इतर तपशील (६ अ हा विकल्प वापरावयाचा असेल तेथे.)

५. सचिव (माहिती तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग हा महाराष्ट्र शासनाच्या वतीने करारावर स्वाक्षरी करण्यास सक्षम असेल. साधारणपणे अर्ज सादर केल्याच्या तारखेपासून १५ दिवसांच्या आत सचिव, माहिती तंत्रज्ञान हा, याला जोडलेल्या नमुन्यात, लायसनच्या संबंधात करार करील. असे लायसन हे १५ वर्षाचा कालावधी किंवा दूरसंचार विभागाकडून असे लायसन जेवढया

कालावधीसाठी घेण्यात आले असेल तो कालावधी यापैकी जो कमी असलेल्या कालावधीपर्यंत वैध असेल.

पुढील शर्ती पूर्ण केल्यास नेहमीचे लायसन शुल्क / सुविधाधिकार शुल्क न लादता लायसन दिले जाईल.

(अ) लायसनधारकाने वा व्यक्तीने वा संस्थने भरणा केलेल्या एकूण समन्याय भांडवलापैकी ५ % हे राज्य शासनाचे बिगर रोखीतील समन्याय भाग भांडवल हे महाराष्ट्र शासनाकडे सुपूर्द केले जाईल. राज्य शासनाचे बिगर रोखीतील समन्याय भाग, लायसनधारक समन्याय भाग भांडवलामधून जसे आणि जेव्हा अभिदान देण्यात येईल त्या भाग भांडवलाच्या प्रमाणात दिले जाईल.

(ब) लायसनधारक व्यक्ती वा संस्था, लायसन कालावधीमध्ये महाराष्ट्र शासनाची कार्यालये तसेच महानगरपालिका, नगर परिषदा आणि जिल्हा परिषदा यांची कार्यालये यांना २ मेगाबाईट इतकी बँड विड्थ स्वतंत्रपणे आणि निःशुल्क वापरण्यास देईल.

७. वरील खंड ६ (अ) मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या, बिगर रोखीच्या समन्याय प्रदानाच्या ऐवजी, शासनाला एक वेळचे आगाऊ प्रदान करण्याचा लायसनधारक व्यक्तीला/ संस्थेला विकल्प असेल.

| | |
|---|---|
| कंपनी ३१ मे, २००२ पर्यंत तिचे जेवढे काम पूर्ण करील तेवढया मार्गाच्या लांबीसाठी | महाराष्ट्र शासनाने निश्चित केले असेल अशा, जाळे टाकण्याच्या कामाच्या प्रमाणकानुसारी किंमतीच्या १% |
| कंपनी दि. १/६/२००२ ते ३१/५/२००३ च्या दरम्यान तिचे जेवढे काम पूर्ण करील तेवढया मार्गाच्या लांबीसाठी | महाराष्ट्र शासनाने निश्चित केले असेल अशा, जाळे टाकण्याच्या कामाच्या प्रमाणकानुसारी किंमतीच्या २% |
| कंपनी मे २००३ नंतर तिचे जेवढे काम पूर्ण करील तेवढया मार्गाच्या लांबीसाठी | महाराष्ट्र शासनाने निश्चित केले असेल अशा, जाळे टाकण्याच्या कामाच्या प्रमाणकानुसारी किंमतीच्या ३% |

८. केबल्स / वाहिन्या घालण्यासाठी पुढीलप्रमाणे प्रमाणकानुसारी किंमती लागू असतील :-

(रुपये लाखात)

| अनुक्रमांक | केबल्स/वाहिन्या यांची संख्या | ग्रामीण क्षेत्र | नगर परिषद क्षेत्र | महानगरपालिका क्षेत्र |
|---|---|---|---|---|
| अ. | २ केबल्स / वाहिन्यांसाठी | ५ | १० | १५ |
| ब. | ३-६ केबल्स / वाहिन्यांसाठी | १० | २० | ३० |
| क. | ७-१२ केबल्स / वाहिन्यांसाठी | १५ | ३० | ४५ |
| ड. | १२ पेक्षा अधिक केबल्स / वाहिन्यांसाठी | २० | ४० | ६० |

९. एका वेळच्या प्रदानाची अर्धी रक्कम शासन परवानगी देताना वरील खंड ७ व ८ अन्वये वसूल करील तर उर्वरित ५०% रक्कम, ही त्यांच्या प्रदेशातून जाणा-या मार्गाच्या लांबीच्या तुलनेत महानगरपालिका / नगर परिषदा / ग्रामीण क्षेत्रे यांच्यामधील मार्गाच्या नकाशांना मान्यता देण्यापूर्वी अनुक्रमे महानगरपालिका / नगर परिषदा / जिल्हा परिषदा वसूल करतील.

१०. स्थनिक स्वराज्य संस्था त्यांची कार्यालीये आणि महाराष्ट्र शासन त्यांच्या कार्यालयांमध्ये २ मेगा बाईट पर्यंत जोडणी प्राप्त करण्यास हक्कदार असतील. माहिती तंत्रज्ञान संचालनालय, स्थानिक स्वराज्य संस्था, महाराष्ट्र शासनाचे विभाग, शैक्षणिक संस्था इत्यादींच्या आवश्यकतांचे समन्वय करील.

११. अशी परवानगी देणारी सक्षम प्राधिकरणे पुढीलप्रमाणे असतील :-

(एक) महानगरपालिका क्षेत्रे-संबंधित महानगरपालिका आयुक्त

(दोन) सिडको क्षेत्रे (महानगरपालिकांच्या क्षेत्राबाहेरील) व्यवस्थापकीय संचालक, सिडको

(तीन) राष्ट्रीय महामार्गाच्या बाजूची जमीन - संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग

(चार) वन जमिनी - प्रधान मुख्य वनसंरक्षक, नागपूर

(पाच) नगर परिषद क्षेत्रे / ग्रामीण क्षेत्रे - संबंधित जिल्हाधिकारी

१२. वन जमिनीमधून जाणा-या केबलच्या /वाहिन्यांच्या बाबतीत, प्रधान मुख्य वनसंरक्षकाने महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.एफ् एल् डी १०००/सीआर३०१/एफ्-१०, दि.१६ ऑक्टोबर,२००१ व भारत सरकारचे पत्र क्र.११-९/९८/एफ सी,दि.१६ ऑक्टोबर, २००० याखाली कार्यवाही करावी.

१३. खाजगी जमिनीमधून जाणा-या केबलच्या / वाहिन्यांच्या बाबतीत, संबंधित महसूल अधिका-याने महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ याच्या कलम १९ अनुसार कार्यवाही करावी.

१४. त्यानंतर लायसनधारक व्यक्तीच्या वा संस्थेच्या मार्ग नकाशास सक्षम प्राधिकरणाकडून मान्यता मिळेल. महाराष्ट्र शासनाबरोबर केलेल्या कराराच्या अटींनुसार महाराष्ट्र शासनाला/स्थानिक स्वराज्य संस्थांना पहिल्या वर्षी पुरविण्याची प्रस्तावित केलेली जोडणी कोणत्या बिंदूवरुन मिळेल ते सुध्दा मार्ग नकाशामध्ये दर्शविण्यांत येईल.

१५. सक्षम प्राधिकारी, अर्ज प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून १५ दिवसांच्या आत तपशीलवार मार्ग नकाशाला मान्यता देईल. जाळे टाकण्याचे काम ज्या मार्गाने करता येईल असा एखादा पर्यायी मार्ग सुचविण्यास सक्षम प्राधिकरण सक्षम असेल. वाहिनीची जागा आणि/ किंवा पुनर्भरण करुन पुन: स्थापना करण्याची पध्दती, यामध्ये सक्षम प्राधिका-यास योग्य ते बदल सूचवता

येतील. त्यानंतर ताबडतोब, संयुक्तरीत्या स्वाक्षरित केलेली मार्ग नकाशाची प्रत माहिती तंत्रज्ञान विभागाला सादर केली जाईल.

१६. महामार्ग/ रस्ते/स्थानिक प्राधिकरणे यांना, भविष्यात व्यापारी दृष्टीने त्यांचा वापर करणे शक्य व्हावे आणि रस्ता वारंवार खोदणे टाळण्यासाठी, महामार्ग/ रस्ते बांधताना किंवा त्यामध्ये सुधारणा करतानाच त्यांच्या बाजूने किंवा त्यांना छेदून वाहिन्या/प्रणाल (conduit) टाकण्याचा पर्याय खुला राहील. अशा वाहिन्या/ प्रणाल अगोदरच टाकल्या असतील अशा ठिकाणी रस्ते/ स्थानिक प्राधिकरणे, लायसनधारकांकडून योग्य ते शुल्क वसूल करुन त्यांना अशा वाहिन्या / प्रणाल यांच्यामधून केबल्स टाकण्यास फर्मावू शकतील.

१७. वर उल्लेखिलेली परवानगी देणा-या सक्षम प्राधिकरणाला, लायसनधारकाने त्याची केबल ही, एकाच ठिकाणी ऑप्टिकल फायबर केबल टाकू इच्छिणा-या एकाहून अधिक लायसनधारकांना संयुक्तरीत्या खोदता व भरता येईल अशा सामायिक खंदकातच घालावी असे विनिर्दिष्ट करण्याचा अधिकार असेल.

१८. केबल / वाहिनी टाकण्याचे काम पूर्ण झाल्यानंतर जमीन पूर्वस्थितीत आणून ठेवणे ही पूर्णपणे लायसनधारकाचीच जबाबदारी असेल. हे काम लायसनधारकाने स्वतःच करावयाचे आहे की लायसनधारक सक्षम प्राधिकरणाला पुनः स्थापना आकार देईल आणि सक्षम प्राधिकरण जमीन/रस्ता/पदपथ यांच्या पुनः स्थापनाचे काम करील ही बाब सक्षम प्राधिका-यास विहित करता येईल. करार निष्पादित झाल्यानंतर ६ महिन्यांच्या आत लायसनधारक केबल/ वाहिनी टाकण्याचे काम पूर्ण करील.

१९. केबल घालण्याचा अधिकार हा अनन्य असणार नाही. महाराष्ट्र राज्य त्याच्या संपूर्ण स्वेच्छाधिकारात, कितीही व्यक्ती वा संस्थांना/ अभिकरणांना महाराष्ट्र राज्यात ऑप्टिकल फायबर केबलच्या जाळया घालण्याची परवानगी देऊ शकेल.

२०. या निर्णयान्वये ज्यांना लायसन देण्यात आले आहे अशा व्यक्ती वा संस्था शासनाची विनिर्दिष्ट परवानगी घेतल्याशिवाय, त्याने घातलेल्या वाहिनीमध्ये उपलब्ध असलेल्या अधिक जागेची विक्री करणार नाही, ती भाडेपट्टयाने देणार नाही, ती अभिहस्तांकित करणार नाही किंवा अन्यथा तिचा व्यापार करणार नाही. अशी परवानगी ही महाराष्ट्र शासनाने निश्चित केलेल्या अटी व शर्तीवर दिली जाईल.

२१. या शासन निर्णयाच्या तरतुदींनुसार महाराष्ट्र शासनाशी करार केलेल्या व्यक्ती वा संस्था दि. ३१-३-२००३ पर्यंत माहिती तंत्रज्ञानातील उद्योग म्हणून समजले जाण्यास पात्र असतील.

२२. हा शासन निर्णय दि. २२ नोव्हेंबर, २००१ पासून अंमलात येईल. महाराष्ट्र शासनाकडून यापूर्वीच परवानगी मिळवलेल्या कंपन्या किंवा त्या त्या स्थानिक मंडळाकडून परवानगी मिळवून ज्यांनी केबल्स/ वाहिन्या घातलेल्या आहेत अशा कंपन्याना सुध्दा हा शासन निर्णय लागू असेल.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

(श्री. एन. आर. गद्रे)
संचालक (माहिती तंत्रज्ञान) आणि
शासनाचे उप सचिव,
सामान्य प्रशासन विभाग.

**प्रत माहितीसाठी अग्रेषित,**

मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय.
महसूल मंत्र्याचे प्रधान सचिव , मंत्रालय.
राज्य महसूल मंत्र्याचे प्रधान सचिव , मंत्रालय.
मुख्य सचिव , मंत्रालय.
प्रधान सचिव रचना व कार्यपध्दती , मंत्रालय.
प्रधान सचिव उद्योग , मंत्रालय.
प्रधान सचिव नगर विकास , मंत्रालय.
सचिव ग्रामविकास , मंत्रालय.
सचिव (रस्ते) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.
इतर सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२

**प्रत योग्य कार्यवाहीसाठी**

सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी.
जमाबंदी आयुक्त व संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व आयुक्त, महानगरपालिका.
सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/ नगर पंचायत.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ.
मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ नागपूर/ अमरावती.
मुख्य अभियंता (विशेष प्रकल्प) सार्वजनिक बांधकाम विभाग, माजगांव, मुंबई - ४०० ०१.
मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग कोकण भवन, नवी मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, सिडको
प्रधान मुख्य वनसंरक्षक, नागपूर.

एच–851(1000–12–01)3अ